**वेतनेत्तर सहाय्यक अनुदानाचा माहे, सप्टेंबर,२०१८ मध्ये देय असलेल्या दुसरा हप्ता वितरित करण्यास मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र अेडीआर २७२४/प्र.क्र.८७/१८/तांशि ६**
मंत्रालय, विस्तार भवन,
मुबंई - ४०००३२.
दिनांक - २६ ऑक्टोबर, २०१८.

<u>वाचा</u> :१) कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई यांचे पत्र क्र.अेओ-डेस्क-पाच/वे-अनु/२०१८/१६८९, दिनांक १० ऑक्टोबर, २०१८.
२) शासन परिपत्रक, वित विभाग, क्र अर्थसं-२०१८/प्र क्र ६९ /अर्थ ३, दिनांक ०२.०४.२०१८.
३) शासन निर्णय, शिक्षण व सेवायोजन विभाग क्र एईडी-१२८७/७४१३/तांशि-३, दिनांक ४.१.१९८८.

**शासन निर्णय**

कला संचालनालयाच्या अधिपत्याखाली कार्यरत असलेल्या १९ अनुदानित कला संस्थांना चार त्रैमासिक हप्त्यामध्ये वेतनेत्तर सहाय्यक अनुदान मंजूर करण्यात येते. संदर्भ क्र २ येथे नमूद वित विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या तपासणी सूचीतील मुद्दयांची पुर्तता होत आहे.यास्तव सदर वेतनेत्तर सहाय्यक अनुदानाचा माहे सप्टेंबर, २०१८ मध्ये देय असलेला दुसरा हप्ता रू ५,६२,०००/- ( रूपये पाच लाख बासष्ट हजार फक्त) वितरीत करण्यास संदर्भ क्र. ३ येथे नमूद दि.४.१.१९८८ च्या शासन निर्णयातील अटींचे पालन करण्याच्या अधिन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा खर्च मागणी क्र डब्ल्यू-४, २२०५-कला व संस्कृती , १०१ ललित कला शिक्षण ,(१०१)(०३) अशासकीय कला संस्थाना सहाय्य, (०३) (०१) सर्व साधारण आवर्ती अनुदाने (२२०५००५५), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर )या लेखाशीर्षाखाली दाखविण्यात यावा. चालू वित्तिय वर्षात या शीर्षाखाली रू २२,४७,०००/-ची तरतूद करण्यात आलेली आहे. सदर खर्च त्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. हे आदेश वित विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८१०२६१७०५१८७५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sandesh Rajaram Utekar

Digitally signed by Sandesh Rajaram Utekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=009789e9fe23fde06096381e43bebecd32b5c692c899745eee7d89d805005a87, cn=Sandesh Rajaram Utekar
Date: 2018.10.26 17:12:06 +05'30'

**(स.रा.उतेकर)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२. महालेखापाल-१/२(लेखा परिक्षा व लेखा अनूज्ञेयता) मुंबई/नागपूर
३. प्र.संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
५. कोषागार अधिकारी, नागपूर/औरंगाबाद,
६. निरिक्षक, चित्रकला व शिल्प , मुंबई.
७. सहाय्यक निरिक्षक ,चित्रकला व शिल्प, विभागीय कार्यालय, नागपूर/औरंगाबाद,
८. कक्ष अधिकारी (साशि-१),उच्च व तंत्रशिक्षण विभाग,मंत्रालय मुंबई-३२.
९. निवड नस्ती, तांशि-६